महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब मधील
पदावर पदोन्नती देण्याकरीता
पदोन्नती समिती गठित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: निसुचि-३६१९/प्र.क्र.१५७/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०१ ऑक्टोबर, २०१९

**वाचा** : सा.प्र.विभाग शा.नि.क्र.२०१८/प्र.क्र.१५९/कार्यासन-१२, दि.०१.०८.२०१९

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १.८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्याकरीता अनुसरावयाच्या कार्यवाही बाबतची एकत्रित मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आली आहेत. सदर शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र शिक्षण सेवेमधील गट ब पदावर पदोन्नती देण्याकरीता पदोन्नती समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र शिक्षण सेवेमधील गट-ब च्या पदावर पदोन्नतीसाठी शिफारस करण्यासाठी यापूर्वी पदोन्नती समिती गठीत करण्यासाठी निर्गमित करण्यात आलेले शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून, पुढीलप्रमाणे नव्याने विभागीय पदोन्नती समिती गठित करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | पदनाम | पदोन्नती समितीमधील पद |
|---|---|---|
| १. | आयुक्त (शिक्षण), आयुक्त कार्यालय, महाराष्ट्रराज्य, पुणे. | अध्यक्ष |
| २. | सह सचिव / उप सचिव (कार्यासन प्रशा. २), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३. | शिक्षण सहसंचालक (प्रशासन, अंदाज व नियोजन), आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |
| ४. | वरील विभागीय पदोन्नती समितीमध्ये मागास प्रवर्गाकरीता प्रतिनिधित्व करणारा सदस्य नसल्यास, समितीच्या अध्यक्षांच्या सहमतीने मागास प्रवर्गाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या एका अधिकाऱ्याचा निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करण्यात येईल. | सदस्य |

२. विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीसाठीची आवश्यक गणपूर्ती:-

समितीच्या बैठकीसाठी अध्यक्ष, एक मागासवर्गीय सदस्य व सचिव/सदस्य सचिव असे किमान ३ सदस्य उपस्थित असणे आवश्यक राहील. तथापि, सचिव/सदस्य सचिव बैठकीस अनुपस्थित असल्यास, समितीचे अध्यक्ष निर्देशित करतील असा अधिकारी सचिव/सदस्य सचिव म्हणून काम पाहतील.

३. विभागीय पदोन्नती समितीचे कार्यक्षेत्र पुढीलप्रमाणे राहील :-

६ व्या वेतन आयोगानुसार ज्या पदांचे ग्रेड वेतन रु. ४८००/- किंवा त्यापेक्षा कमी आहे, अशा महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब पदांसाठी पदोन्नतीची शिफारस करण्यासाठीचे प्रस्ताव विचारात घेणे व सेवा प्रवेश नियमाच्या तरतूदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश / मार्गदर्शक सूचना विचारात घेवून पदोन्नतीसाठी पात्र अधिकाऱ्यांची निवडसूची तयार करुन विभागास शिफारस करणे

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००११७१०००४१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHIL KHODWEKAR

Digitally signed by SUSHIL KHODWEKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=1c4a8f0aafeac0a009d462f7f02d23942001d76225b9f704de26731171c8684b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=19b0ccbee5810aa5e36e9fa467a7630471d3c500ceb353fbb37bf0b6dfe0407a, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUSHIL KHODWEKAR
Date: 2019.10.01 17:11:28 +05'30'

**( सुशील खोडवेकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
२. आयुक्त, शिक्षण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. सर्व शिक्षण संचालक
४. सर्व सह सचिव/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
६. सर्व प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था.
७. सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक/प्राथमिक/निरंतर शिक्षण)
८. निवडनस्ती प्रशा-२.